**औरंगाबाद मध्यवर्ती कारागृह येथील**
दोन वर्कशेडच्या तळमजल्याचे बांधकामासाठी येणाऱ्या
अतिरिक्त खर्चास मंजुरी देणेबाबत.

महाराष्ट्र शासन

गृह विभाग

शासन निर्णय क्रमांक-बीएलडी-१०९५/२/८२/पीआरएस-२

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक :- २९ ऑक्टोबर १९९९.

वाचा:- १) शासन निर्णय क्र.बीएलडी-१०९५/२/८२/पीआरएस-२ दिनांक ८.१.९७.

२) कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्रमांक-बीएलडी/२०४८/कक्ष-३, दिनांक ३१.७.९९.

**शासन निर्णय :-**

औरंगाबाद मध्यवर्ती कारागृह येथे दोन कारखाना शेड बांधण्यास येणाऱ्या रु.३९,३१,९२१/-(रुपये एकोणचाळीस लक्ष एकतीस हजार नऊशे एकवीस) इतक्या खर्चास उपरोक्त विषयावरील समक्रमांकाच्या दिनांक ८.१.९७ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. त्यानंतर मागील प्रस्तावात तळ मजल्याच्या अतिरिक्त कामासाठी येणाऱ्या खर्चाचा समावेश नव्हता. यास्तव या प्रकरणी अतिरिक्त येणाऱ्या रु.५,२३,८१०/- (रुपये पाच लाख तेवीस हजार आठशे दहा) एवढ्या अतिरिक्त पूरक खर्चास मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

२. कारागृह महानिरीक्षक यांच्या कार्यालयाच्या प्रस्तावाच्या अनुषंगाने उपरोक्त अतिरिक्त अनुषंगिक खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याचा शासनाने आता निर्णय घेतला आहे. यास्तव उपरोक्त औरंगाबाद मध्यवर्ती कारागृहातील दोन वर्कशेडच्या तळमजल्यासाठी येणाऱ्या रु.५,२३,८१०/- (रुपये पाच लाख तेवीस हजार आठशे दहा फक्त) एवढ्या अतिरिक्त खर्चास शासन या आदेशाद्वारे प्रशासकीय मान्यता देत आहे.

३. हा खर्च "४०५९ - सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च-०१ कार्यालयीन इमारती १०१ बांधकाम पंचवार्षिक योजनांतर्गत योजना मुख्य मागणी क्र.एच १५" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व सन १९९९-२००० साठी मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. हे आदेश सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक-२८०२ इमारती २ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने व प्रशासकीय व वित्तीय अधिकारांचे प्रदान वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८ यात दुरुस्त्या याबाबत वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक-विअप्र-१०९२/प्र.क्र.११३/९२ विनियम दिनांक १.६.९२ सोबत जोडलेल्या परिशिष्ट उपविभाग-पाच अनुक्रमांक ९ अनुसार व सार्वजनिक बांधकाम विभाग नियमपुस्तिकेच्या नियमावलीखालील प्रदान करण्यात आलेले अधिकार नियमपुस्तिकेतील परिच्छेद क्र.१३४ अनुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय शक्तींचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(ग.ज.कुळकर्णी)

कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन